**सामाजिक न्याय विभागांतर्गत ५ मागासवर्गीय महामंडळांकरीता राष्ट्रीय महामंडळांच्या मागासवर्ग वित्त व विकास, नवी दिल्ली यांच्या कर्जास दिलेल्या हमीत वाढ करणेबाबत...**

## महाराष्ट्र शासन

**सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग**

**शासन निर्णय क्रमांकः क्र.- वनाम-२०१२/प्र.क्र.८५(भाग-१)/महामंडळे**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक

मंत्रालय विस्तार भवन, मुंबई ४०० ०३२

तारीख: ४ ऑगस्ट,२०१४

**प्रस्तावना :-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत राज्यातील अनुसूचित जाती, विमुक्त जाती व भटक्या जमाती, इतर मागासवर्ग, विशेष मागासप्रवर्ग व्यक्तींना रोजगारांच्या माध्यमातून सर्वांगीन उन्नती व्हावी, यासाठी राज्य शासनाच्या नियंत्रणाखाली खालील ५ महामंडळे स्थापन करण्यात आलेली असून ती कंपनी कायदा १९५६ प्रमाणे नोंदणीकृत आहेत :-१) महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ,२) लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ, ३)संत रोहीदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ,४)वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ,५) महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ, सदर महामंडळांमार्फत राज्याच्या व राष्ट्रीय महामंडळाच्या योजना राबविण्यात येतात. यामुळे सदर महामंडळांना राष्ट्रीय महामंडळाची वाहीनीकृत यंत्रणा म्हणून मान्यता देण्यात आलेली आहे. केंद्रीय महामंडळांच्या योजनां राबविण्यासाठी राष्ट्रीय महामंडळांकडून कर्ज स्वरुपात निधी उपलब्ध करुन देण्यात येतो. याकरीता राष्ट्रीय महामंडळे राज्य शासनाकडून हमी देण्याबाबत आग्रही असतात यापूर्वी उपरोक्त ५ महामंडळांना देण्यात आलेला हमीचा कालावधी समाप्त झाल्याने राष्ट्रीय महामंडळांनी राज्य महामंडळाला कर्ज देणे बंद केले आहे. राष्ट्रीय महामंडळांकडून निधी उपलब्ध होत नसल्याने राज्य महामंडळांकडे प्रलंबित असलेली

कर्जप्रकरणे व त्यामुळे लाभार्थ्यांमध्ये या परिस्थतीचा विचार करुन, राष्ट्रीय महामंडळांच्या कर्जास शासन हमी देण्याचा प्रस्ताव विचाराधीन होता.

**शासन निर्णय:-**

सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागांतर्गत उपरोक्त कार्यरत असलेल्या ५ महामंडळांना राष्ट्रीय महामंडळांकडून कर्ज उपलब्ध होण्यासाठी खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आलेली ठोक हमी देण्याचा निर्णय शासनाने घेतला आहे :-

**(रु.कोटीत)**

| **राज्य महामंडळाचे नाव** | **ज्या महामंडळास शासन हमी द्यावयाची आहे त्या राष्ट्रीय महामंडळाचे नाव** | **शासन हमीची रक्कम** |
|---|---|---|
| महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ | १) राष्ट्रीय अनुसूचित जाती आर्थिक विकास महामंडळ, नवी दिल्ली | ६०.५२ |
| | २)राष्ट्रीय सफाई कामगार आर्थिक विकास महामंडळ, नवी दिल्ली | ७.०५ |
| लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ | राष्ट्रीय अनुसूचित जाती आर्थिक विकास महामंडळ, नवी दिल्ली | ६०.५० |
| संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ | राष्ट्रीय अनुसूचित जाती आर्थिक विकास महामंडळ, नवी दिल्ली | ३१.१५ |
| वसंतराव नाईक विमुक्त जाती, भटक्या जमाती विकास महामंडळ | राष्ट्रीय मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली | २८.२० |
| महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग व विकास महामंडळ | राष्ट्रीय मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली | ७०.५० |
| | **एकूण हमीची रक्कम** | **२५७.९२** |

२. शासन हमीवरील कर्ज रु.२५७.९२ कोटी आवश्यकतेनुसार उचलण्यासाठीची मुदत दि.३१/०५/२०१६ पर्यंत वैध राहील. तसेच महामंडळाने दिलेल्या हमी रक्कमेच्या मर्यादेतच कर्ज उचल करण्याची कार्यवाही करावी.

३. महामंडळांना वरिल प्रमाणे देण्यात आलेली ठोक हमी वित्त विभागाने शासन निर्णय,दि.५/११/१९९९ मध्ये नमूद केलेल्या पुढील अटी व शर्तींच्या अधीन राहील :-

i. वरील महामंडळे (Principal Debtor ) राहतील.

ii. सदर महामंडळाने खर्चावर नियंत्रण ठेऊन व्याज हमी शुल्क याची पूर्णपणे वसुली होवू शकेल याची पूर्ण व्यवस्था करावी.

iii. ज्या लाभार्थ्यांना कर्ज देण्यात येते त्या लाभार्थ्यांची पतयोग्यता व योग्य प्रतिभूती यांची छाननी व खात्री करुन घेण्याची यंत्रणा महामंडळांनी कार्यान्वीत करावी. त्याचप्रमाणे कर्ज फेडीत कसुरी झाल्यास, कर्ज मंजूरी /शिफारस करणाऱ्या अधिकाऱ्यांवर कार्यवाही करण्यात येईल व त्यांचे या संबधीत अधिकार काढून घेण्यात येतील.

iv. महामंडळांनी प्रत्येक वर्षाच्या सुरुवातीस राष्ट्रीय महामंडळांकडून उपलब्ध होणाऱ्या कर्जाबाबतचा आढावा घेऊन त्या संबंधीच्या वित्तीय मर्यादा शासनाकडून निश्चित करुन घ्याव्यात.

v. महामंडळांनी लाभार्थ्यांनी मंजूर केलेल्या कर्जाची वसुली परतफेडीच्या वेळापत्रकानुसार वेळोवेळी करावी.

vi. महामंडळांनी दर तीन महिन्यांनी कर्ज मंजूर झालेल्या प्रकल्पाच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती तसेच कर्ज मंजूर झालेल्या प्रकल्पाच्या प्रगतीबाबतची स्थिती दर्शविणारी माहिती तसेच कर्ज वसुलीव वित्तीय दायित्वाचा अहवाल सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग/वित्त विभागाकडे सादर करावा.

vii. महामंडळांनी विहित कार्यपध्दतीने लेखा परीक्षीत केलेल्या व शासन मान्य केलेल्या लेख्याची एक प्रत प्रत्येक वर्ष संपल्यानंतर सहा महिन्याच्या आत शासनास सादर करावी.

४. राष्ट्रीय महामंडळ, नवी दिल्ली बरोबर शासन हमीवर घेण्यात येणाऱ्या कर्जासंबधी करण्यात येण्धाऱ्या करारपत्रात खालील अटी व शर्तींचा समावेश करण्यात यावा.

**अ) राष्ट्रीय महामंडळ यांचेसाठी अटी व शर्तीं :-**

i) राष्ट्रीय महामंडळास राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय राज्य महामंडळास या आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज देणार नाही.

ii) राज्य महामंडळांकडून कर्जाच्या परतफेडीबाबत अथवा व्याजाची अथवा व्याजाची रक्कम देण्याबाबत होणाऱ्या कसुरीची शासनास ९० दिवसाच्या आत सूचना देणे राष्ट्रीय महामंडळांवर बंधकारक असेल.

iii) राष्ट्रीय महामंडळाकडील कर्जाची परतफेड करण्यास विलंब झाल्यास त्याकरिता आकारण्यात आलेल्या दंडनीय व्याजाकरिता व इतर कोणत्याही देय रकमांसाठी शासन हमी लागू होणार नाही.

**ब) राज्य महामंडळांसाठी अटी व शर्तीं :-**

i. राज्य महामंडळास राष्ट्रीय महामंडळाकडून राज्य शासनाच्या पूर्व अनुमतीशिवाय या आदेशामध्ये विहित केलेल्या मर्यादेपेक्षा अधिक कर्ज घेणार नाही.

ii. राष्ट्रीय महामंडळाकडून ज्या प्रकल्पांना कर्ज मंजूरी दिलेली आहे, ते प्रकल्प व लाभार्थी वर्धनक्षम आहेत याची महामंडळाने खात्री करुन घ्यावी. तसेच, राष्ट्रीय महामंडळांनी दिलेल्या कर्जाचा निधी ज्या प्रयोजनासाठी व अटीनुसार दिलेला आहे, त्यानुसार तो निधी विनियोगात आणावा.

iii. राष्ट्रीय महामंडळाकडून घेतलेल्या कर्जाचे राज्य महामंडळाने लाभार्थ्यांमार्फत कर्जाचा योग्य नियोग/उपयोग होतो किंवा कसे यावर राज्य महामंडळाने लक्ष ठेवावे. त्यासाठी आवश्यक ती तपासणी करावी. यामध्ये कसूर केल्यास, सदर बाब शासनाच्या निदर्शनास आणावी व कर्ज वितरण तात्काळ बंद करावे.

iv. राज्य महामंडळांच्या लाभार्थ्यांकडून कर्ज फेडीत कसुरी होण्याची शक्यता विचारात घेऊन, कर्जाच्या वसुलीकरिता पुरेशा मत्तेची प्रतिभूती म्हणून घेतल्यानंतरच कर्ज मंजूरी करेल. तसेच सदर मत्तेची प्रतिभूती म्हणून घेतल्यानंतरच कर्ज मंजूरी करेल. तसेच सदर मत्तेची तपासणी वेळोवेळी व कमीतकमी ६ महिन्यातून करेल.

v. राज्य महामंडळ त्यांच्या आर्थिक स्थितीबाबतचा अहवाल सोबत जोडल्या प्रपत्र "अ" मध्ये शासनास दर सहा महिन्यानी (३० मार्च/३० सप्टेंबर) सादर करेल.

**क) शासन हमी आवाहनीत करण्यासंदर्भात दोन्ही महामंडळांसाठी सामायिक अटी व शर्ती :-**

i. राष्ट्रीय महामंडळ, नवी दिल्ली यांच्याकडून घेतलेल्या कर्जाची परतफेड करण्याकरिता कर्ज वसुलीचा राज्य महामंडळ सर्वोतोपरी प्रयत्न करेल व असे प्रयत्न केल्यानंतरही वसुली झाली नाही तर प्रथमत: कर्ज परतफेडीमध्ये कसुरी करणाऱ्या लाभार्थ्यांच्या मत्तेची विक्री करुन राज्य महामंडळाला कर्जाची परतफेड करेल व कर्जाचे दायित्व शासनावर पडणार नाही याची दक्षता घेईल.

ii. राष्ट्रीय महामंडळ, नवी दिल्ली यांनी राज्य महामंडळाला मंजूर केलेल्या कर्जाच्या आदेशामध्ये नमूद केलेल्या परतफेडीच्या वेळापत्रकानुसार कर्जफेडीच्या शेवटच्या हप्त्याच्या १ वर्षानंतरच्या दिनांकास हमी संपुष्टात येईल. सदर वेळापत्रकात नमूद केलेल्या विहित कालावधीसाठीच शासन हमी लागू राहिल. या कालावधी नंतर राष्ट्रीय महामंडळ, नवी दिल्ली यांना सदर हमी आवाहनीत करता येणार नाही.

## ५. हमी शुल्क

i. राज्य महामंडळास प्र.श.प्र.व. हमीशुल्काचा दर प्रचलित दरानुसार खालील प्रमाणे राहील :-

| **राज्य महामंडळाचे नाव** | **हमी शुल्क आकारण्याचे दर (द.सा..द.शे.)** |
|---|---|
| महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ | रु. ०.२० |
| लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ | रु. ०.५० |
| संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ | रु. २.०० |
| वसंतराव नाईक विमुक्त जाती व भटक्या जमाती विकास महामंडळ | रु. ०.५० |
| महाराष्ट्र राज्य इतर मागासवर्ग व विकास महामंडळ | रु. २.०० |

उपरोक्त हमीशुल्क ज्या कालावधीकरीता कोणत्याही दिवशी कमाल अदत्त असलेल्या कर्ज आणि व्याजाच्या एकूण रकमेवर (Total Maximum Outstanding Amount) देय राहील.

ii. हमी शुल्काचा भरणा दर सहा महिन्यांनी वसुली करुन शासनाच्या खाती जमा करण्यास राज्य महामंडळांचे व्यवस्थापकीय संचालक हे जबाबदार असतील. प्रत्येक वित्तीय वर्षाच्या ३१ मार्च आणि /अथवा ३० सप्टेंबर, रोजी अदत्त असलेल्या घटना सापेक्ष दायित्वावर (Contingent Liability) अनुज्ञेय असलेल्या हमी शुल्काचा भरणा १ एप्रिल, आणि/अथवा १ ऑक्टोबर रोजी करावा.

iii. हमी शुल्काचा भरणा केल्यानंतर त्यामधून प्रथम थकित हमी शुल्कावरील दंडनीय व्याजाची रक्कम वळती करुन घेण्यात येईल. नंतर सर्वात जुन्या थकित हमी शुल्काची वसुली व त्यानंतर त्यापेक्षा कमी जुन्या थकित हमी शुल्काची वसुली याप्रमाणे रक्कम वळती करुन घेण्यात येईल.

iv. देय हमी शुल्क शासन तिजोरीत भरणा करण्यास महामंडळाकडून कसूर झाल्यास अशा कसूर केलेल्या थकीत रक्कमेवर पहिल्या तीन महिन्यासाठी १६ टक्के दराने व त्या पुढील कालावधीसाठी २४ टक्के दराने व्याज आकारले जाईल.

v. राज्य महामंडळाने शासन हमी शुल्काची रक्कम “००७५ - संकिर्ण, सर्वसाधारणा सेवा-१०८ हमी शुल्क” या लेखाशिर्षाखाली शासकीय कोषागारात भरणा करावी. व्यवस्थापकीय संचालक यांनी महामंडळाकडून देय असलेली हमी शुल्काची रक्कम शासकीय कोषागारात नियमितपणे भरणा करण्यात येत असल्याची याची खात्री करुन घ्यावी.

vi. हमी शुल्क भरल्याच्या पृष्ठयर्थ चलनाची सांक्षाकित प्रत विभागामार्फत वित्त विभागास पाठवावी.

vii. राज्य महामंडळाने देय हमी शुल्काचा भरणा केला नाही तर सदर हमीशुल्क विभागाकडे भरणा करेल व महामंडळाकडून वसूल करेल.

६. राष्ट्रीय महामंडळ, नवी दिल्ली समवेत कर्ज घेण्यासंबधी करावयाच्या करार पत्रावर स्वाक्षरी करण्याकरीता सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभागातील संबंधित सह सचिव / उप सचिव (महामंडळे) व वित्त विभागातील सह सचिव/उप सचिव (अर्थबळ) यांना प्राधिकृत करण्यात येत आहे.

७. हा शासन निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारीक सहमतीने (क्र.१३७/२०१२/अर्थबळ, दि. २४/०३/२०१४) निर्गमित करण्यात येत आहे.

८.   सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८०४१८२६३०६८२२ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pratap Pandurang Lubal

Digitally signed by Pratap Pandurang Lubal
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Social Justice &Spl Assistance, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Pratap Pandurang Lubal
Date: 2014.08.04 18:26:30 +05'30'

**(प्र.पां.लुबाळ)**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रत,

१. आयुक्त, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे
२. प्रादेशिक उपायुक्त, समाजकल्याण, मुंबई विभाग, नवी मुंबई (दोन प्रती)
३. व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय अनुसूचित जाती आर्थिक विकास महामंडळ, नवी दिल्ली
४. व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय सफाई कामगार आर्थिक विकास महामंडळ, नवी दिल्ली
५. व्यवस्थापकीय संचालक, राष्ट्रीय मागासवर्ग वित्त व विकास महामंडळ, नवी दिल्ली
६. व्यवस्थापकीय संचालक, महात्मा फुले मागासवर्ग विकास महामंडळ (मर्या.) मुंबई
७. व्यवस्थापकीय संचालक, लोकशाहीर अण्णाभाऊ साठे विकास महामंडळ (मर्या.), मुंबई
८. व्यवस्थापकीय संचालक, संत रोहिदास चर्मोद्योग व चर्मकार विकास महामंडळ (मर्या.), मुंबई
९. व्यवस्थापकीय संचालक, वसंतराव नाईक वि. जा.व भ. ज. विकास महामंडळ (मर्या.), मुंबई
१०. व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य इतर मागास. वित्त आणि विकास महामंडळ(मर्या.), मुंबई
११. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता/लेखा परिक्षा) महाराष्ट्र १ / मुंबई
१२. सहसंचालक, लेखा व कोषागारे, संगणक कक्ष,नवीन प्रशा. भवन, ५ मजला, मंत्रालयासमोर,मुंबई-३२.

१३. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.

१४. जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे

१५. अप्पर कोषागार अधिकारी, कोकणभवन, नवी मुंबई.

१६. वित्त विभाग, (का व्यय १४/अर्थबळ/साउ), मंत्रालय, मुंबई.

१७. कार्यासन अधिकारी, (अर्थसंकल्प), सामाजिक न्याय व विशेष सहाय्य विभाग, मंत्रालय, मुंबई३२.

१८. निवड नस्ती का-महामंडळे